महाराष्ट्र शासन

अविवि-२०१३/प्रक्र.१३७ (भाग-१)/ का.०७,
अल्पसंख्याक विकास विभाग,
मादाम कामा रोड, हुतात्मा चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दि. ०७ /०५/२०१५

**विषय :- १२ व्या पंचवार्षिक योजनेत केंद्र पुरस्कृत बहुक्षेत्रीय विकास कार्यक्रमातंर्गत (MsDP) जिंतूर, जि.परभणी येथील अल्पसंख्यांक समाजातील मुलींसाठी १०० प्रवेशक्षमतेच्या वसतीगृह बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**संदर्भ :-** १.अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.३/१०१/२०१२-PP, दि.२४/१२/२०१२

२.अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.३/१३ (४)/२००८-PP-I, दि.१९/०२/२०१३

३.शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अविवि-२०१२/ प्र.क्र.१३७/ का.७, दि.२८ मार्च, २०१३

४.जिल्हाधिकारी, परभणी यांचे पत्र क्र. २०१५/अल्पसंख्याक /सामान्य/कावी-३१, दि.३१/०१/२०१५.

**ज्ञापन:-**

१२ व्या पंचवार्षिक योजनेत केंद्र शासनाच्या अल्पसंख्यांक कार्य मंत्रालयाच्या बहुक्षेत्रिय विकास कार्यक्रमांतर्गत (MsDP) गठीत शक्तीप्रदान समितीने दि.१३/१२/२०१२ रोजीच्या ६२ व्या बैठकीत पाथरी, सेलू आणि जिंतूर, जि. परभणी येथे मुलींसाठी १०० प्रवेशक्षमतेचे प्रत्येकी ०१ याप्रमाणे एकूण ०३ वसतीगृह बांधकाम प्रस्तावास मान्यता दिली असल्याचे संदर्भाधिन क्र. (१) येथील पत्रान्वये कळविण्यात आले आहे. केंद्र शासनाच्या अल्पसंख्यांक कार्य मंत्रालयाने संदर्भाधिन क्र. (२) येथील पत्रान्वये सदर प्रयोजनासाठी पहिल्या टप्प्यात रु.४६५.०० लाख इतका निधी वितरित केला असून, संदर्भाधिन क्र. (३) येथील शासन निर्णयान्वये सदर निधी जिल्हाधिकारी, परभणी यांना विहीत अटींच्या अधीनतेने सुपूर्द करण्यात आला आहे. या पार्श्वभूमीवर जिल्हाधिकारी, परभणी यांनी संदर्भाधीन क्र. (४) येथील पत्रान्वये जिंतूर, जि. परभणी येथील मुलींच्या १०० प्रवेशक्षमतेच्या वसतीगृह बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याच्या दृष्टीने प्रस्ताव, ढोबळ अंदाजपत्रकासह शासनास सादर केला आहे.

२. जिल्हाधिकारी, परभणी यांनी सादर केलेल्या प्रस्तावामधील जिंतूर, येथील मुलींच्या १०० प्रवेशक्षमतेच्या वसतीगृह बांधकामाचा ढोबळ अंदाजपत्रकाचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | तपशील | प्रस्तावित रक्कम रुपये | प्रशासकीय मान्यता दयावयाची प्रस्तावित रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | वसतीगृह मुख्य इमारत बांधकाम किंमत, | २,६९,४४,१५५/- | २,६९,४४,१५५/- |
| २ | विमा १% | २,६९,४४२/- | २,६९,४४२/- |
| ३ | एकूण | २,७२,१३,५९७/- | २,७२,१३,५९७/- |
| | SAY | २,७२,१४,०००/- | २,७२,१४,०००/- |

३. जिल्हाधिकारी, परभणी यांनी सादर केलेल्या जिंतूर, जि.परभणी येथील मुलींच्या १०० प्रवेशक्षमतेच्या वसतीगृहाच्या बांधकामासाठीच्या ढोबळ अंदाजपत्रकानुसार (बांधकाम सूची दर सन २०१२-१३ नुसार) रु. २, ७२, १४, ०००/- (रुपये दोन कोटी, बहात्तर लाख, चौदा हजार मात्र) इतका खर्च येणे अपेक्षित आहे. जिल्हाधिकारी, परभणी यांनी सादर केलेल्या जिंतूर, जि.परभणी येथील मुलींच्या १०० प्रवेशक्षमतेच्या वसतीगृह बांधकामासाठी येणाऱ्या रु. २, ७२, १४,०००/- (रुपये दोन कोटी, बहात्तर लाख, चौदा हजार मात्र) इतक्या खर्चाच्या ढोबळ अंदाजपत्रकास याव्दारे पुढील अटींच्या अधिनतेने प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. :-

i) मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग, महाराष्ट्र राज्य, यांनी तयार केलेल्या व शासनमान्य बांधकाम आराखडयानुसार/नकाशानुसार (तळमजला + ०३ मजले, संदर्भ क्र.THLSL-६११९) जिंतूर, जि. परभणी येथील मुलींच्या वसतीगृहाचे बांधकाम करणे आवश्यक राहील, याबाबत जिल्हाधिकारी, परभणी आणि सार्वजनिक बांधकाम विभागाने दक्षता घ्यावी,

ii) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड यांनी जिंतूर, जि.परभणी येथील मुलींच्या वसतीगृहाच्या स्थापत्य बांधकामांस (Civil Construction) तांत्रिक मान्यता प्रदान करताना विहित केलेल्या सर्व अटींची संबंधितांकडून पूर्तता करण्यात येत असल्याबाबत/आल्याबाबत जिल्हाधिकारी, परभणी आणि सार्वजनिक बांधकाम विभागाने खातरजमा करावी,

iii) सार्वजनिक बांधकाम मंडळाच्या सक्षम प्राधिकाऱ्याची जिंतूर, जि.परभणी येथील मुलींच्या वसतीगृह बांधकामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास संबंधितानी तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घेण्यात यावी त्याचप्रमाणे सक्षम प्राधिकाऱ्याने तांत्रिक मान्यता दिलेल्या सविस्तर अंदाजपत्रकानुसार मुलींच्या वसतीगृहाचे बांधकाम करण्यात येत असल्याबाबत/आल्याबाबत जिल्हाधिकारी, परभणी आणि सार्वजनिक बांधकाम विभागाने खातरजमा करावी,

iv) केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार मुलींच्या वसतीगृहासाठी केंद्र हिस्सा १००% असा आहे. त्यानुसार जिंतूर, जि.परभणी येथील मुलींच्या वसतीगृहाच्या बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे विहित नमुन्यात संबंधिताकडून प्राप्त करुन घेऊन ती वेळोवेळी शासनास सादर करण्याबाबत जिल्हाधिकारी, परभणी यांनी कार्यवाही करावी,

v) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.२०१२/प्र.क्र.१३७/का-७, दि. २८/०३/२०१३ अन्वये परभणी जिल्हयातील पाथरी, सेलू व जिंतूर, येथील मुलींच्या ०३ वसतीगृह बांधकामासाठी केंद्र शासनाकडून प्रथम टप्प्यात प्राप्त निधी जिल्हाधिकारी, परभणी यांना वितरीत करण्यात आला आहे. जिंतूर, जि.परभणी येथील मुलींच्या वसतीगृहाच्या बांधकामासाठी या निधीचा उचित विनियोग होत असल्याबाबत जिल्हाधिकारी, परभणी यांनी खातरजमा करावी,

vi) केंद्रशासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या दि.१६/०२/२०१५ रोजीच्या पत्रातील सूचनांनुसार बहुक्षेत्रिय विकास कार्यक्रमाअंतर्गत (MsDP) वितरीत करण्यात येणा-या निधीस VAT वा कोणत्याही प्रकारचे विभागीय कर लागू राहणार नाहीत.

vii) जिंतूर, जि.परभणी येथील मुलींच्या वसतीगृहाचे बांधकाम हे संबंधित नगरपालिकेच्या मालकीच्या जागेत करण्यात येत असल्याबाबत जिल्हाधिकारी, परभणी यांनी खातरजमा करावी,

viii) जिल्हाधिकारी, परभणी यांनी जिंतूर, जि.परभणी येथील वसतीगृह बांधकामासाठी दुसऱ्या टप्प्यातील निधीची मागणी करताना पहिल्या टप्प्यात प्राप्त सर्व निधीच्या वापराबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे प्रस्तावासोबत शासनास सादर करावीत,

ix) जिंतूर, जि.परभणी येथील मुलींच्या वसतीगृह बांधकामास सन २०१३-१४ या आर्थिक वर्षापासून सुरवात करण्यात आली असून, ती विहीत कालावधीत कार्यान्वित होतील याबाबत जिल्हाधिकारी, परभणी व सार्वजनिक बांधकाम विभागाने दक्षता घ्यावी,

x) केंद्र शासनाच्या मान्यतेनुसार जिंतूर, जि.परभणी येथील मुलींच्या वसतीगृह बांधकामाचे वर्षनिहाय खर्चाचे नियोजन पुढीलप्रमाणे राहील :-

(रु. कोटीत)

| आर्थिक वर्ष | अपेक्षित खर्च | सुरु असलेल्या इतर कामासाठी आवश्यक तरतूद | एकूण मंजूर तरतूद |
|---|---|---|---|
| २०१३-१४ | १.५५ | - | १.५५ |
| २०१४-१५ | | - | |
| २०१५-१६ | १.५५ | - | १.५५ |
| **एकूण** | ३.१० | - | ३.१० |

xi) केंद्र शासनाच्या मान्यतेनुसार जिंतूर, जि.परभणी येथील मुलींच्या वसतीगृह बांधकामाच्या वित्तीय नियोजनाचा तपशील पुढीलप्रमाणे राहील :-

(रु. कोटीत)

| कामाचे नाव | एकूण अपेक्षित खर्च | सन २०१३-१४ ते २०१४-१५ या मागील वर्षाअखेर झालेला खर्च | सन २०१५-१६ चालू वर्षात अपेक्षित खर्च | पुढील वर्षासाठी Carry forward करावयाची अपेक्षित तरतूद |
|---|---|---|---|---|
| जिंतूर मुलींचे वसतीगृह | ३.१० | १.५५ | १.५५ | |
| **एकूण** | ३.१० | १.५५ | १.५५ | |

xii) केंद्र शासनाच्या मान्यतेनुसार जिंतूर, जि.परभणी येथील मुलींच्या वसतीगृह बांधकामातंर्गत केंद्र हिश्श्यावर होणारा खर्च “मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना, (००) (१७) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रीय विकास योजना (केंद्र हिस्सा) (२२३५ ए ५४३) ३१ - सहाय्यक अनुदान (वेतनेतर)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा,

५. प्रस्तुत शासन ज्ञापन, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग पाच अ.क्र.१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५०७१२११५५४३१४ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Hari Gaikwad

Digitally signed by Ashok Hari Gaikwad
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ashok Hari Gaikwad
Date: 2015.05.07 12:13:30 +05'30'

**( अशोक गायकवाड )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
२. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व परीक्षा ) मुंबई/नागपूर
३. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (बांधकामे), मंत्रालय, मुंबई
४. जिल्हाधिकारी, परभणी
५. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, औरंगाबाद
६. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड
७. कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ, परभणी
८. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा परभणी
९. वित्त विभाग (अर्थसंकल्प -४/ व्यय -४) मंत्रालय, मुंबई
१०.नियोजन विभाग (कार्या.१४७५)
११.निवड नस्ती, (का.७)